भूमीसंपादन, पुनर्वसन आणि पुनर्स्थापना प्राधिकरण, औरंगाबाद यांच्या आस्थापनेवरील एकूण १३ अस्थायी पदांना दिनांक ०१.३.२०२३ पासून दिनांक ३१.८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत....

महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक :- आरपीए-२०२१/प्र.क्र.७५/र-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- १० मार्च, २०२३

**वाचा :-**

१) महसूल व वन विभाग शासन अधिसूचना, क्र. आरपीए-१४१५/प्र.क्र.४५/र-१, दि.११.९.२०१९

२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. आरपीए-१४१५/प्र.क्र.४५/र-१, दि.०४.१०.२०२२

३) वित्त विभाग शासन निर्णय क्रमां: पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दि.०८.२.२०२३

४) निबंधक, महाराष्ट्र भूमीसंपादन, पुनर्वसन आणि पुनर्स्थापना प्राधिकरण,औरंगाबाद, यांचे पत्र क्रमांक जा.क्र.२०२३/भू.पु.पु.प्रा./ लेखा/कावी,/७६ दि.०६.२.२०२३

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने भूमीसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पादर्शकतेचा हक्क अधिनियम, २०१३ हा नवीन अधिनियम भूमीसंपादन व पुनर्वसन यासाठी एकत्रितपणे पारित केला आहे. या अधिनियमातील कलम ५१ नुसार शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग, दि.११.९.२०१९ अन्वये औरंगाबाद येथे कोकण, नाशिक, पुणे व औरंगाबाद या विभागासाठी भूमीसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरणाची स्थापना करण्यात आली आहे. सदर प्राधिकरणाकरिता महसूल व वन विभाग, शासन निर्णय दिनांक २८.२.२०२० अन्वये १३ पदांची निर्मिती करण्यात आली आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०८.२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ठ असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.३.२०२३ ते दि.३१.८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन भूमीसंपादन, पुनर्वसन आणि पुनर्स्थापना प्राधिकरण, औरंगाबाद या कार्यालयातील एकूण १३ अस्थायी पदांना वरील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

भूमीसंपादन,पुनर्वसन आणि पुनर्स्थापना प्राधिकरण, औरंगाबाद या कार्यालयातील खालील विवरणपत्रातील एकूण १३ अस्थायी पदांना दि.०१.३.२०२३ ते दि.३१.८.२०२३ पर्यंत (६ महिने पर्यत) या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

**पदाचा तपशील**

| अ. क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (रु.) | संख्या |
|---|---|---|---|
| १ | पिठासीन अधिकारी (जिल्हा न्यायाधिश)<br>Presiding Officer (District Judge) | ५१५००-१२३०-५८९३०-१३८०-६३०७० | १ |
| २. | निबंधक (तहसिलदार संवर्ग) | ५६१००-१७५१०० | १ |
| ३. | कार्यकारी सहायक (अव्वल कारकून संवर्ग) | २९२००-९२३०० | २ |
| ४. | कार्यकारी सहायक (लघूलेखक संवर्ग) | ३८६००-१२२८०० | १ |
| ५. | कार्यकारी सहायक (लिपिक-टंकलेखक संवर्ग) | १९९००-६३२०० | ४ |
| ६. | वाहन चालक (बाहय स्त्रोत) | १५००० | १ |
| ७. | शिपाई (बाहय स्त्रोत) | १२००० | ३ |
| | | **एकूण** | **१३** |

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च मागणी क्र. सी-०५, प्रधान लेखाशिर्ष २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०१-पुनर्वसन, २०२ इतर पुनर्वसन योजना, (०३) प्रकल्प बाधित व्यक्तीची पुनर्वसाहत, (०३) (०९) भुसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण (२२३५ सी ४४८) या लेखाशिर्षाखालील सन २०२२-२०२३ च्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय, वित्तविभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क, दिनांक ०८.२.२०२३ अन्वये प्रशासकीय विभागांस प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३१०१२५९५१८२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHULARAM R NIKHARE

Digitally signed by CHULARAM R NIKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E37123E923CF43F99F06B54384FF491E5F703F14D653B5A59D47EAB1F73E2597, cn=CHULARAM R NIKHARE
Date: 2023.03.10 13:04:44 +05'30'

**( चु. रा. निखारे )**
**कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद
२) निबंधक (तहसिलदार), भूमी संपादन,पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण, औरंगाबाद
३) महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र, नागपूर
४) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
५) प्रधान सचिव (आ.व्य.प्र. म. व पु.) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
६) उपसचिव (श्री.नायक) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
७) वित्त विभाग (आपुक कक्ष), मंत्रालय, मुंबई
८) कार्यासन ब-१,/कार्यासन ई-३ महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई
९) र-१ कार्यासन निवडनस्ती.